महाराष्ट्र राज्यातील आदिवासी उपयोजना क्षेत्राच्या बेंचमार्क सर्वेक्षणाबाबत....

**महाराष्ट्र शासन**
**आदिवासी विकास विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक : आविवि-२०१४/प्र.क्र.२१३/का.०५**
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- ०७ जुलै, २०१५.

वाचा-

१) शासन निर्णय क्र.आविवि-२०१५/प्र.क्र.२१३/का.०५ दि.१६ ऑगस्ट, २०१४.
२) शासन शुद्धीपत्रक क्रमांक:-आविवि-२०१४/प्र.क्र.२१३/का.५, दि.२१ आक्टोंबर, २०१४

प्रस्तावना :-

राज्यातील अनुसूचित जमातीतील लोकांचा व त्यांच्या क्षेत्राचा सर्वांगिण विकास व्हावा, यासाठी आदिवासी उपयोजनेचा अवलंब करण्यात आलेला आहे. सदर आदिवासी उपयोजनेतील विविध कार्यक्रम, योजना व प्रकल्प यांचे यथायोग्य नियोजन, अंमलबजावणी व मूल्यमापन करण्याच्या दृष्टीने राज्यातील अनुसूचित जमातींचा बेंचमार्क सर्वेक्षण होणे गरजेचे आहे. त्यानुषंगाने बेंचमार्क सर्व्हेक्षण करण्याची एकत्रित जबाबदारी आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे व गोखले इंस्टिट्युट ऑफ पॉलीटीक्स अ‍ॅण्ड इकॉनॉमीक्स, पुणे या दोन संस्थेवर देवून सर्वेक्षणाच्या रु.५५०.०० लक्ष किंमतीच्या अंदाजपत्रकास दिनांक १६.०८.२०१४ च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यांत आली. तसेच शासन शुद्धीपत्रक दि. २१ आक्टोंबर, २०१४ अन्वये बेंचमार्क सर्वेक्षणाच्या सुधारीत आराखडयास एकुण रु. ७२६.०० लक्ष इतक्या रक्कमेस सुधारित प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आली होती.

सदर सर्वेक्षणांतर्गत वाढीव मुद्दयांबाबत गोखले इंस्टिटयूट ऑफ पॉलिटिक्स अ‍ॅन्ड इकॉनॉमिक्स, पुणे यांचे मार्फत सादर झालेल्या अंदाजपत्रकातील रक्कमेमध्ये वारंवार बदल सुचविण्यात आले, तथापि या बाबत योग्य ते स्पष्टीकरण पाठपुरावा करुनही प्राप्त न झाल्याबाबत आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे यांनी शासनास कळविले होते. तसेच गोखले इंस्टिटयूट ऑफ पॉलिटिक्स अ‍ॅन्ड इकॉनॉमिक्स, पुणे या संस्थेने सदर सर्वेक्षणाच्या कामकाजाकरिता विहित केलेल्या मुदतीत काम पूर्ण करणे शक्य नसल्याचे कळविले आहे. या सर्व बाबी विचारात घेता गोखले इंस्टिटयूट ऑफ पॉलिटिक्स अ‍ॅन्ड इकॉनॉमिक्स, पुणे या संस्थेवर सोपविण्यांत आलेल्या बेंचमार्क सर्वेक्षणाच्या कामाबाबत निर्णय घेण्याची तसेच बेंचमार्क सर्वेक्षण पूर्ण करण्याबाबत इतर माध्यम स्विकारण्याबाबतची बाब शासनाच्या विचाराधीन होता.

**<u>शासन निर्णय</u>** :-

राज्याच्या अनुसूचित जमातीच्या लोंकाचे व त्यांच्या क्षेत्राचे बेंचमार्क सर्वेक्षण करण्याची गोखले इंस्टिटयूट ऑफ पॉलिटिक्स ॲन्ड इकॉनॉमिक्स, पुणे या संस्थेस सोपविण्यांत आलेले काम रद्द करण्यात येत असून शासन निर्णय क्र. निर्णय क्र.आविवि-२०१५/प्र.क्र.२१३/का.०५ दि.१६ ऑगस्ट, २०१४ व शुध्दीपत्रक क्र आविवि-२०१४/प्र.क्र.२१३/का.५, दि.२१ आक्टोंबर, २०१४ याद्वारे अधिक्रमीत करण्यांत येत आहे.

२. राज्याच्या अनुसूचित जमातीच्या लोंकाचे व त्यांच्या क्षेत्राचे बेंचमार्क सर्वेक्षणाचे काम करण्यास इच्छुक असलेल्या संस्थांकडून स्वारस्याची अभिव्यक्ती (Expression of Interest) मागविण्यास मान्यता देण्यांत येत आहे.

३. बेंचमार्क सर्वेक्षणाचे कामकाज योग्य पद्धतीने व विहीत मुदतीत पुर्ण करण्याकरीता खालीलप्रमाणे सल्लागार समिती गठित करण्यात येत आहे.

| | | |
|---|---|---|
| १. सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई | - | अध्यक्ष |
| २. प्रधान सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई | - | सदस्य |
| ३. संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई. | - | सदस्य |
| ४. संचालक, टाटा समाजशास्त्र संस्था, मुंबई. | - | सदस्य |
| ५. आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक | - | सदस्य |
| ६. संचालक, इंदिरा गांधी विकास संशोधन संस्था, मुंबई. | - | सदस्य |
| ७. युनिसेफचे राज्य प्रमुख. | - | सदस्य |
| ८. आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे | - | सदस्य सचिव |

४. वरीलप्रमाणे गठीत करण्यांत आलेल्या समितीची कार्यकक्षा खालीलप्रमाणे असेल -

१. स्वारस्याची अभिव्यक्ती (Expression of Interest) प्रारुपास मान्यता देणे.

२. ईच्छुक संस्थाकडून प्राप्त झालेल्या प्रस्तावांची छाननी करुन संस्थेची निवड करणे.

३. संस्थेची निवड झाल्यावर सदर संस्था व आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्थेमध्ये बेंचमार्क सर्वेक्षाणाच्या कामाची कर्तव्य व जबाबदाऱ्या निश्चित करणारे सामंजस्य करार अंतिम करणे.

४. बेंचमार्क सर्वेक्षणाचे कामकाज विहित वेळेत व योग्य रित्या पुर्ण करण्यासाठी कामाचा वेळो-वेळी आढावा घेवून आवश्यक ते मार्गदर्शन करणे.

५. बेंचमार्क सर्वेक्षणासंदर्भात या समितीमध्ये प्रशासकीय विभागाचे अधिकारी, तज्ञ व्यक्ती किंवा संस्थेचे सदस्य म्हणून घेण्यास किंवा त्यांना आमंत्रित करण्याचे अधिकार समितीस राहतील.

६. सर्वेक्षणाचे काम पुर्ण झाल्यावर सविस्तर अहवाल शासनास सादर करणे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०७०७१५२७०६५६२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Laxmikant G Dhoke

Digitally signed by Laxmikant G Dhoke
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Deputy Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Laxmikant G Dhoke
Date: 2015.07.07 15:29:06 +05'30'

**(ल.गो. ढोके)**
उप सचिव

**प्रत,**

१. मा.मंत्री, आदिवासी विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
२. मा.राज्यमंत्री, आदिवासी विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
३. मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई
४. महालेखापाल (लेखा परिक्षा), (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई.
५. महालेखापाल (लेखा परिक्षा), (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, नागपूर
६. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
७. प्रधान सचिव, ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
८. सचिव, आदिवासी विकास, मंत्रालय, मुंबई
९. आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक.
१०. आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे
११. संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय मुंबई
१२. संचालक, टाटा समाजशास्त्र संस्था, मुंबई.
१३. संचालक, इंदिरा गांधी विकास संशोधन संस्था, मुंबई.
१४. युनिसेफचे राज्य प्रमुख.
१५. सर्व जिल्हाधिकारी, महाराष्ट्र राज्य
१६. सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी (जिल्हा परिषद)
१७. अपर आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक/ठाणे/अमरावती/नागपूर
१८. सर्व प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प
१९. उप मुख्य कार्यकारी अधिकारी (ICDS), जिल्हा परिषद, ठाणे
२०. सर्व उप सचिव/ अवर सचिव / कक्ष अधिकारी, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
२१. निवड नस्ती (का.०५), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.